GR-200410271624410001-0100

दक्षता जनजागृती सप्ताह (Vigilance Awareness Week) साजरा करण्याबाबत.
दि.३१ ऑक्टोबर, ते ६ नोव्हेंबर

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२००१/११२८/प्र.क्र.४३/०१/११-अ,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक २२.१०.२००१.

**शासन निर्णय :-**

राज्यात गतवर्षी प्रथमच दि. ३१ ऑक्टोबर ते ४ नोव्हेंबर, २००० या कालावधीत "दक्षता जागरुकता सप्ताह" (Vigilance Awareness Week) आयोजित करण्यात आला होता. जनतेमध्ये भ्रष्टाचाराबाबत जागृती निर्माण करण्याच्या दृष्टीने सदर उपक्रम अत्यंत उपयुक्त सिध्द झाल्याने आता, प्रतिवर्षी सरदार वल्लभभाई पटेल यांच्या दि.३१ ऑक्टोबर या जन्मदिवसापासून एक आठवडा (दि. ३१ ऑक्टोबर ते ६ नोव्हेंबर) या कालावधीत "दक्षता जनजागृती सप्ताहाचे"(Vigilance Awareness Week) आयोजन करण्यात यावे असा निर्णय घेण्यात आला आहे.

दक्षता जनजागृती सप्ताहाचे आयोजन करताना पुढे नमूद केलेल्या मार्गांचा अवलंब करण्यात यावा.

अ) राज्य शासनाचे सर्व विभाग व त्यांच्या नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख/ कार्यालय प्रमुख, राज्य शासनाचे अंगीकृत उपक्रम, सहकारी संस्था, स्वायत्त संस्थामार्फत सप्ताहाचे आयोजन करण्यात यावे.

ब) दि. ३१ ऑक्टोबर रोजी सकाळी ११.०० वाजता भ्रष्टाचार निर्मूलनाची शपथ घेऊन कार्यक्रमाचा प्रारंभ होईल. विभाग/ कार्यालय प्रमुख किंवा उपस्थितांपैकी ज्येष्ठतम अधिकारी सर्वांना शपथ देतील. (शपथेचा नमुना सोबत जोडला आहे.)

क) शपथ घेतल्यानंतर मा.राज्यपाल व मा.मुख्यमंत्री यांनी या सप्ताहानिमित्त दिलेला संदेश उपस्थितांना वाचून दाखविण्यात येईल.

ड) या सप्ताहाच्या निमित्ताने मा.राज्यपाल व मा.मुख्यमंत्री यांचा संदेश राज्यातील जनतेसाठी प्रसृत करण्यात यावा.

इ) या सप्ताहाच्या निमित्ताने पुढील कार्यक्रमांचे आयोजन करण्यात यावे.

१. कार्यालयाच्या दर्शनी भागात व मोक्याच्या ठिकाणी भित्तीपत्रक, कापडी फलक लावणे.
२. कार्यालये/शाळा/महाविद्यालयांमध्ये भ्रष्टाचाराच्या दुष्परिणामांवर प्रकाश टाकण्यासाठी चर्चासत्रे/ वादविवाद स्पर्धा/व्याख्याने/निबंधस्पर्धा/कार्यशाळा यांचे आयोजन करणे.
३. विशेष पुस्तिकांचे (Special Journal) प्रकाशन करणे.
४. राज्यातील अशासकीय संघटना, स्वयंसेवी संस्था, सामान्य नागरीक यांना दक्षता जनजागृती मोहिमेत सहभागी होण्याचे आवाहन करणे.

क्र.मा.प.

५. केंद्रीय दक्षता आयोगाच्या http://www.cvc.nic.in या संकेतस्थळावर (Web-site) उपलब्ध साहित्याचा जनतेमध्ये वितरणासाठी उपयोग करणे.

याव्यतिरिक्त कार्यालयीन इमारतीच्या दर्शनी भागावर "भ्रष्टाचारासंबंधी काही माहिती असल्यास अगर लाच मागणाऱ्या लोकसेवकाबद्दल तक्रार असल्यास लाचलुचपत प्रतिबंध विभागाशी संपर्क साधावा" अशी सूचना व लाचलुचपत प्रतिबंध विभागाच्या स्थानिक कार्यालयाचा पत्ता आणि दूरध्वनी क्रमांक लिहिलेला कायमस्वरुपी फलक लावण्यात यावा.

या सप्ताहांच्या आयोजनासाठी स्वतंत्रपणे निधी उपलब्ध करुन देता येणार नसल्याने प्रत्येक कार्यालयाने त्यांच्याकडील उपलब्ध निधीतूनच खर्च करावा.

दक्षता जनजागृती सप्ताहाच्या आयोजनासंबंधीची जबाबदारी महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंध विभाग यांच्यावर सोपविण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(बी.के.अग्रवाल)
शासनाचे अपर मुख्य सचिव.

प्रति,

राज्यपालांचे प्रधान सचिव,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधान सभा सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधान परिषद सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* आयुक्त राज्य निवडणूक आयोग, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग/कार्यालय प्रमुख,
सा.प्र.विभागातील सर्व प्रशासकीय कार्यासने,
निवड नस्ती.

* पत्राने.